हिंगोली जिल्ह्यात 'मा.बाळासाहेब ठाकरे हरिद्रा (हळद) संशोधन व प्रशिक्षण केंद्र' च्या अंमलबजावणी करीता सन २०२४-२५ करिता निधी वितरीत करणेबाबत. (2401 B446)

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: हसंप्र २०२४/प्र.क्र. १२४/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २७ मार्च, २०२५

वाचा:- १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. हसंप्र २०२२/प्र.क्र. ११७/९-अे, दि. १४.०९.२०२२
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. हसंप्र २०२४/प्र.क्र. १२४/९-अे, दि. ३०.०७.२०२४
३ वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस २०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४
४. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. हसंप्र २०२४/प्र.क्र. १२४/९-अे, दि. ०९.०८.२०२४
५. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. हसंप्र २०२४/प्र.क्र. १२४/९-अे, दि. १६.०९.२०२४
६. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. हसंप्र २०२४/प्र.क्र. १२४/९-अे, दि. २३.०१.२०२५
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस २०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दि. १२.०२.२०२५
८. आयुक्त (कृषि) यांचे जा.क्र. कृआ/फलो-३/हरिद्रा/निधी.मागणी/५४३२/२०२५, दि. १०.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

हिंगोली जिल्ह्यामध्ये 'मा. बाळासाहेब ठाकरे हरिद्रा (हळद) संशोधन व प्रशिक्षण केंद्र' कंपनी कायद्याच्या कलम ८ नुसार ना-नफा तत्त्वावर एक स्वायत्त संस्था म्हणून स्थापन करण्यास उपरोक्त वाचा येथील दि. १४.०९.२०२२ रोजीच्या शासन निणर्यान्वये मंजूरी देण्यात आली आहे. सदर केंद्रामध्ये काम करणाऱ्या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन अदा करीता उपरोक्त वाचा येथील दि. ३०.०७.२०२४ व दि.०९.०८.२०२४ रोजीच्या शासन निणर्यान्वये निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच, दि. १६.०९.२०२४ व दि. २३.०१.२०२५ रोजीच्या शासन निर्णयांन्वये योजनेसाठी सन २०२४-२५ करीता निधी वितरीत करण्यात आला आहे. आता सदर योजनेकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी पुढील निधी वितरणाचा प्रस्ताव उपरोक्त वाचा येथील दि. १०.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्यानुसार आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुलक्षून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) मा. बाळासाहेब ठाकरे हरिद्रा (हळद) संशोधन व प्रशिक्षण केंद्राकरीता सन २०२४-२५ मध्ये २४०१B४४६ या लेखाशीर्षाखाली ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) उद्दिष्टांखाली रु. १८४.२० लाख व ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या उद्दिष्टांखाली रु. ६००.६० लाख असा एकूण रु. ७८४.८० लाख (रुपये सात कोटी चौऱ्याऐंशी लाख ऐंशी हजार फक्त) निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर निधी खालील लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. डी -३
२४०१ - पीक संवर्धन
०० - ११९ - फलोत्पादन व भाजीपाला पिके
(०४) - मसाला पिके
(०४)(०१)- मा. बाळासाहेब ठाकरे हरिद्रा (हळद)
संशोधन व प्रशिक्षण केंद्र (१००% राज्य योजना)
(कार्यक्रम) (२४०१ बी४४६) (कार्यक्रम)

३) या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता कृषि आयुक्तालय स्तरावर सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा स्तरावर लेखाधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालय, हिंगोली यांना आहरण व संवितरण अधिकारी तर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, हिंगोली यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४) सदर योजना राबविताना दि. १४.०९.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सदर वितरीत निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

६) उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त (कृषि) व कृषी व पदुम विभाग, मंत्रालय यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

७) निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८) सदर आदेश, नियोजन विभागाचा अनौ. संदर्भ क्र. १४६/का. १४३१, दि. २०.०३.२०२५ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र. १११/२०२५/व्यय-१, दि. २५.०३.२०२५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं.-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२७१०४९२०५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VRUSHALI YOGESH SANGLE

Digitally signed by VRUSHALI YOGESH SANGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=38340178b558138729554a37a04d3127c1c97082ed3e433b6459142735a1fba3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3FFC4F6688129303EDCA6D1ABD7CED0BC33A45451BD4D2FA7BE02E7363B75969, cn=VRUSHALI YOGESH SANGLE
Date: 2025.03.27 10:50:36 +05'30'

**(वृषाली सांगळे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
५) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा. बाळासाहेब ठाकरे हरिद्रा (हळद) संशोधन व प्रशिक्षण केंद्राचे अध्यक्ष.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११) आयुक्त (कृषि), कृषिआयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) आयुक्त (अन्न व औषध प्रशासन), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) विकास आयुक्त (उद्योग), महाराष्ट्र राज्य.
१४) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण आणि संशोधन परिषद, पुणे.
१५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई.
१७) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, हिंगोली.
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,हिंगोली.
१९) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषिआयुक्तालय, पुणे.
२०) संचालक (आयुष), आयुष संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१) संचालक संशोधक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
२२) विभागीय कृषि सह संचालक, लातूर.
२३) जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी/तालुका कृषि अधिकारी, हिंगोली, नांदेड, परभणी.
२४) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२५) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
२६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२७) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
२८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२९) सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-४०० ०३२
३०) जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली.
३१) अवर सचिव (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३२) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३३) निवड नस्ती ९-अे.